**अंगणवाडी सेविका / मदतनीस / मिनी अंगणवाडी सेविका यांचे मानधन अदा करण्यासाठी अर्थसंकल्पित केलेला निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१९/प्र.क्र.१११/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : - ०१ ऑक्टोंबर, २०१९

**वाचा :-** (१) महिला व बाल विकास विभाग, शासन परिपत्रक क्र.बीजीटी-२०१९/प्र.क्र.१४/का.४, दिनांक १०/४/२०१९
(२) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२०१९/प्र.क्र.१११/का.६, दिनांक १२/४/२०१९
(३) महिला व बाल विकास विभाग, शासन पत्र क्र.एबावि-२०१९/प्र.क्र.१२१/का.६, दिनांक १९/६/२०१९
(४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८/७/२०१९
(५) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२०१९/प्र.क्र.१११/का.६, दिनांक १८/७/२०१९
(६) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२०१९/प्र.क्र.१११/का.६, दिनांक १३/८/२०१९
(७) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांचे पत्र क्र.एबाविसेयो/ का-३/मानधन-तरतूद/४३७१/१९-२०, दि.१९/०८/२०१९

**शासन निर्णय :-**

महिला व बाल विकास विभागामार्फत एकात्मिक बाल विकास सेवा योजना ही केंद्र पुरस्कृत योजना आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई या कार्यालयाकडून राबविण्यात येत आहे. अंगणवाडी सेविकांच्या मानधनासाठी वाढीव मंजूर अनुदानानुसार केंद्र / राज्य व राज्य हिस्सा यासाठी एकूण वार्षिक रुपये १५२२६५.८१ लाख इतका खर्च येणार आहे. त्यानुसार प्रतिमाह केंद्र / राज्य व राज्य हिस्सा याप्रमाणे एकूण रुपये १२६.८८ कोटी इतका मानधनासाठी खर्च अपेक्षित आहे. एकात्मिक बाल विकास सेवा योजना ही केंद्र पुरस्कृत योजना असून केंद्र व राज्य हिश्याचे निधीचे प्रमाण ६०:४० असे आहे. केंद्र शासनाकडून निधी प्राप्त झाल्याशिवाय अर्थसंकल्पित केलेली Shadow तरतूद खर्च करुन नये अशा वित्त विभागाच्या सूचना आहेत. केंद्र शासनाकडून वेळेत निधी प्राप्त होत नसल्यामुळे अंगणवाडी सेविकांचे मानधन वेळेत अदा करणे शक्य होत नाही. यास्तव मानधनाची रक्कम उणे प्राधिकारपत्रावर काढण्यास मान्यता देण्याबाबत वित्त विभागास विनंती करण्यात आली होती. अपर मुख्य सचिव (वित्त) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २ जून, २०१७ रोजी वित्त विभागाने बैठकीचे आयोजन केलेले होते. सदर बैठकीत सेविकांच्या मानधनाची अर्थसंकल्पित केलेली रक्कम केंद्र शासनाकडून निधी प्राप्त झाला नसला तरी खर्च करण्यास विभागास परवानगी देण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे.

२. अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका यांना देण्यात येणाऱ्या मानधनासाठी सन २०१९-२० मध्ये मूळ अर्थसंकल्पित केलेला निधी व पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित केलेला निधी ८०% च्या मर्यादेत वितरीत करण्यास संदर्भाधिन क्र.६ येथील दि.१३/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये परवानगी देण्यात आलेली आहे. तथापि, अतिरिक्त राज्य हिश्श्याच्या लेखाशिर्षामधून मानधनाकरीता तरतूद अपूरी असल्याने उर्वरित २०% निधी वितरीत करण्याबाबत आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी संदर्भाधिन क्र.७ येथील दि.१९/०८/२०१९ च्या पत्रान्वये विनंती केली आहे. त्याअनुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब विचाराधीन होती.

३. त्याअनुषंगाने खालील तक्त्यातील रकाना क्र.६ नुसार निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरण करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| लेखाशिर्ष व बाब | अर्थसंकल्पीत निधी | पुरवणी मागणीद्वारे प्राप्त झालेला निधी | एकुण अर्थसंकल्पित निधी | वितरीत केलेला निधी | प्रस्तावित वितरण |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| २२३६१९४५ (राज्य)१००% ०२-मजूरी | ३४४६६.०० | १६६९०.०० | ५११५६.०० | ४०९२४.८० | १०२३१.२० |

हा शासन निर्णय नियोजन विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.१५०/१४७२, दिनांक ३०/०८/२०१९ व वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.१३३/व्यय-६, दिनांक २०/०९/२०१९ अन्वये देण्यात आलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१००११४५३४०७८३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2019.10.11 12:46:25 +05'30'

**(ला. रा. गुजर)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई
४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
५) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.
६) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे.
७) सर्व जिल्हाधिकारी
८) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद)
९) सर्व महिला व बाल विकास अधिकारी (जिल्हा परिषद)

१०) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रामीण/नागरी/आदिवासी) प्रकल्प

११) वित्त विभाग (व्यय/६ ,अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.

१२) नियोजन विभाग (का.१४७२), मंत्रालय,मुंबई.

१३) अवर सचिव (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
त्यांना कळविण्यात येते की, त्यांनी BDS प्रणालीवर निधी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना वितरीत करावा.

१४) निवड नस्ती -का-६.